GR-200406231422060001-0100

**भूतपूर्व दुय्यम सेवा मंडळाच्या कक्षेतील**
**गट "क" वर्गीय पदांवरील सेवाभरतीबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक- प्रानिमं ३००४/प्र.क्र.३२/२००४/१३-अ,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
**दिनांक :- ९ जून ,२००४.**

**वाचा :-**
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं- १०९५/ प्र.क्र.३४/९५/१३-अ, दिनांक :- १० नोव्हेबर,१९९५
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-प्रानिमं-३०९९/५५५/ प्र.क्र. ६९/९९/१३-अ, दिनांक :- ११ जून,१९९९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं- ३०९९/५५५/ प्र.क्र. ६९/९९/१३-अ, दिनांक :- १५ जून,१९९९
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- प्रानिमं-३०९९/५५५/ प्र.क्र. ६९/९९/१३-अ, दिनांक :- १ जुलै,१९९९
५) शासन परिपत्रक ,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- संकीर्ण- १००३/ प्र.क्र. ९६/२००३/१३-अ, दिनांक :- १९ नोव्हेंबर ,२००३
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - प्रानिमं-३००४/ प्र.क्र.३२/२००४/१३-अ, दिनांक ५ जून,२००४.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन क्रमांक ६ येथील समक्रमांकाचे दिनांक ५ जून,२००४ चे आदेश रद्द करण्यात येत आहेत.

२. संदर्भाधीन क्र. २ व ३ येथील शासन निर्णय व क्र. ४ येथील शासन परिपत्रकानुसार स्थापन करण्यात आलेल्या निवड समित्यांमार्फत विहित पध्दती अनुसरुन भूतपूर्व निवड मंडळांच्या कक्षेतील गट "क" वर्गीय पदांवरील भरती करण्यात येते. अशी भरती करताना संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार सध्या लेखी परीक्षेस ९०% गुण व १०% इतके गुण मुलाखतीस ठेवले आहेत. यामध्ये बदल करुन आता यापुढे गट "क" ची रिक्त पदे नामनिर्देशनाने भरतांना ७५% लेखी अथवा किमान शैक्षणिक पात्रतेच्या इयत्तेत / परीक्षेत उमेदवारांना मिळालेल्या गुणांसाठी व २५ % तोंडी गुणांद्वारे भरतीची प्रकिया करण्यात यावी, असा निर्णय शासनाने घेतला आहे.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील आदेश त्यांच्या प्रशासकीय अधिपत्याखालील सर्व कार्यालयांना / नियुक्ती प्राधिका-यांना कळवावेत आणि या आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी केली जाईल याबाबत दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चारुशीला सोहोनी)
प्रधान सचिव (सेवा ), महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

क.मा.प.

उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त /उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई.
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
महालेखापाल- महाराष्ट्र(१), मुंबई
महालेखापाल- महाराष्ट्र (२), नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,.
निवड नस्ती.

* पत्राने.